जिल्हा परिषदा व पंचायत समित्यांमधील बांधकामे/ विकास योजना यांच्याशी संबंधित प्रशासकीय व तांत्रिक मान्यता आणि निविदा/ कंत्राट स्विकारण्याच्या अधिकारात वाढ करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन शुध्दीपत्रक क्रमांक : झेडपीए-२०१६/प्र.क्र .५६/वित्त-९**

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई ४००००१
तारीख : ०६ सप्टेंबर, २०२१

**वाचा :-**

१) ग्रामविकास व जलसंधारण विभाग, शासन निर्णय क्रमांक : झेडपीए-२०१६/प्र.क्र.५६/ वित्त-९, दि.०७ ऑक्टोबर, २०१७
२) ग्रामविकास विभाग, शासन शुध्दीपत्रक क्रमांक : झेडपीए-२०१६/प्र.क्र.५६/वित्त-९, दि.०१ मार्च, २०१८

**प्रस्तावना :-**

शासन निर्णय क्रमांक: झेडपीए- २०१६/प्र.क्र.५६/वित्त-९, दिनांक ०७ ऑक्टोबर, २०१७ अन्वये जिल्हा परिषदांमधील बांधकामे व विकास योजना राबविण्यासाठी प्रशासकीय व तांत्रिक मंजूरी देण्याबाबत जिल्हा परिषदा व पंचायत समित्यांना अधिकार प्रदान करण्यात आले आहेत. दि.०७ ऑक्टोबर २०१७ च्या शासन निर्णयातील भाग-१ मध्ये मूळ बांधकामे व दुरुस्ती यांच्या संबंधातील प्रशासकीय मान्यता देण्याचा अधिकार जिल्हा परिषदेस प्रदान करण्यात आले आहेत. सद्यस्थितीत राज्यातील विविध जिल्हा परिषदांकडून उपरोक्त दि.७ ऑक्टोबर, २०१७ च्या शासन निर्णयामध्ये केलेल्या सुधारणांच्या अनुषंगाने जिल्हा परिषद अंतर्गत विविध विकास कामे व विकास योजना राबविण्यासाठी अधिकतम मर्यादेत वाढ करण्याबाबत विचारणा होत आहे.

उपरोक्त बाबींचा विचार करता दि.७ ऑक्टोबर, २०१७ च्या शासन निर्णयातील भाग-१ मध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.

## शासन शुध्दीपत्रक :-

शासन निर्णय क्रमांक: झेडपीए- २०१६/प्र.क्र.५६/वित्त-९, दिनांक ०७ ऑक्टोबर, २०१७ मधील भाग-१ मध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.

**महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती लेखा संहिता, १९६८ मधील नियम-४ खालील परिशिष्ट-दोन मधील जिल्हा परिषदा व पंचायत समितींच्या शक्तींची प्रक्रांती**

(Devolution of Powers)

| अ.क्र | अधिकाराचे स्वरूप | अधिकार प्रदान करण्यात आलेले प्राधिकारी /प्राधिकरण (Authority) | अंदाजित अनावर्ती खर्च(रुपयात) | |
|---|---|---|---|---|
| | | | न्यूनतम मर्यादा | अधिकतम मर्यादा |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| भाग-१ | मूळ बांधकामे व दुरुस्ती यांच्या संबंधातील प्रशासकीय मान्यता देण्याचा अधिकार | **जिल्हा परिषद** | | |
| | | १.उप अभियंता | ० | ३,००,००० * पर्यंत |
| | | २.जिल्हा परिषदेचे खातेप्रमुख | ३,००,००१ | १५,००,००० * पर्यंत |
| | | ३.मुख्य कार्यकारी अधिकारी /अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी | १५,००,००१ | ५०,००,००० *पर्यंत |
| | | ४.अध्यक्ष, स्थायी समिती | ५०,००,००१ | ६०,००,००० * |
| | | ५.सभापती, विषय समिती | ५०,००,००१ | ५५,००,००० * |
| | | ६.विषय समिती | ५५,००,००१ | ६०,००,००० * |
| | | ७.स्थायी समिती | ६०,००,००१ | ७५,००,००० |
| | | ८.जिल्हा परिषद | ७५,००,००१ | संपूर्ण अधिकार |
| | | **पंचायत समिती** | | |
| | | १.गट विकास अधिकारी | ० | १०, ००, ०००* |
| | | २.सभापती,पंचायत समिती | १०, ००, ००१ | १५,००,००० * |
| | | ३.पंचायत समिती | १५,००,००१ | संपूर्ण अधिकार |

**टिप:- १) (*) संबंधित स्तरावर दिलेल्या मान्यतेची माहिती विषय समितीस/स्थायी समितीस/ पंचायत समितीच्या पुढील बैठकीत अवलोकनार्थ सादर करण्यात यावी. तसेच जिल्हा परिषदेतील प्रत्येक विभागांनी यासंदर्भात केलेल्या कार्यवाहीचा अहवाल जिल्हा परिषदेच्या आगामी सर्वसाधारण सभेत सादर करण्यात यावा.**

या अनुषंगाने महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती लेखा सहिता, १९६८ मधील नियम ४ खालील परिशिष्ट दोन मध्ये आवश्यक ते बदल करण्यात येतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१०९१७१६०१०५६९२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAVIN DEVICHAND JAIN

Digitally signed by PRAVIN DEVICHAND JAIN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e86ac5658c4f446f46a56052bf048257ffe4ea09078de9d556ae5babe8adc8b1, pseudonym=37D9D56800E3803E7F4DEAA21F9F7FAB712736F6, serialNumber=481AF6EECE7C1D432D3119135BE703BF6529E7A455A9B17708C677B565D8EE24, cn=PRAVIN DEVICHAND JAIN
Date: 2021.09.20 15:19:38 +05'30'

**( प्रवीण देविचंद जैन )**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
२. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
३. मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव
४. मा.राज्यमंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव
५. मा.अप्पर मुख्य सचिव (ग्रा.वि ) यांचे स्वीय सहाय्यक
६. सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष
७. मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक
८. मा.विधान सभा / विधान परिषद सदस्य
९. महालेखाकार ( स्थानिक संस्था ) महाराष्ट्र-१, मुंबई (पाच जादा प्रतीसह)
१०. महालेखाकार ( स्थानिक संस्था ) महाराष्ट्र-२, नागपूर (पाच जादा प्रतीसह)
११. सर्व विभागीय आयुक्त ( महसूल )
१२. संचालक तथा मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, म.रा. कोकण भवन, नवी मुंबई
१३. सर्व सहसचिव /उपसचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४. सर्व सह मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा (कोकण/नाशिक/पुणे/ नागपूर/ औरंगाबाद/अमरावती)
१५. सर्व जिल्हा परिषदाचे मुख्य कार्यकारी अधिकारी
१६. सर्व जिल्हा परिषदाचे अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी

१७. सर्व जिल्हा परिषदाचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी
१८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१९. वित्त विभाग ( व्यय-१५/अर्थ-१७/वित्त आयोग कक्ष )
२०. ग्राम विकास विभाग ( सर्व कार्यासने )
२१. निवड नस्ती (वित्त-९)